सातारा सैनिकी शाळेच्या नुतनीकरण करण्यासाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,**
**शासन निर्णय क्र. सासैशा-२०२१/प्र.क्र.१५१ /एसएम-६**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ११ मार्च, २०२५.**

संदर्भ :

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र. मुअपु/का-२/इमा/५५५२/२०२१ दिनांक: ०३/११/२०२१
२) शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक यांचे पत्र क्र. सैशासा/शा.नु./२०२०-२१/माध्य-ब/एस-५/४००८ दिनांक: १८/११/२०२१
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. सासैशा २०२१/ प्र.क्र.१५१/ एसएम-६, दिनांक: ११.०१.२०२२.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१.
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१.
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३.०२.२०२२.
७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. सासैशा २०२१/ प्र.क्र.१५१/ एसएम-६ दिनांक: १६.०३.२०२२.
८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. सासैशा २०२१/ प्र.क्र.१५१/ एसएम-६ दिनांक: ३०.०३.२०२२.
९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक: १२.०४.२०२३.
१०) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दिनांक: ०५.०२.२०२४.
११) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. सासैशा-२०२१/प्र.क्र.१५१/एसएम- ६, दिनांक: २७.१०.२०२३
१२) शिक्षण उप संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे यांचे दिनांक १२.०२. २०२४ रोजीचे पत्र.
१३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. सासैशा-२०२१/प्र.क्र.१५१/एसएम- ६, दिनांक: २०.०२.२०२४.
१४) शिक्षण उप संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे यांचे क्र. शिमंसा-२०२३ (एस-५)/सासैशा/पु.मा./निधी/३३१६, दिनांक: २६.०६. २०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:**

सातारा सैनिक शाळेची स्थापना दिनांक २३ जून, १९६१ रोजी झाली असून ही देशातील पहिली सैनिकी शाळा आहे. सातारा सैनिक शाळेचा परिसर ११५ एकर सरकारी जागेमध्ये आहे. या परिसरातील काही इमारती ब्रिटीश काळातील असून काही इमारती सन १९६१ मध्ये सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत बांधण्यात आलेल्या आहेत. त्यांचे बांधकाम जुन्या पध्दतीचे असून सदर इमारती धोकादायक झालेल्या आहेत. सातारा सैनिक स्कूल नियमावलीतील नियम क्र. १५.०४ नुसार, तसेच दिनांक ३०.१२.२०१६ रोजी झालेल्या सामंजस्य करारानुसार सातारा सैनिक शाळेच्या इमारत देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी राज्य शासनाची आहे.

२. सातारा सैनिकी शाळेच्या नूतनीकरणाचा रु. २९९.२८ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकाचा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम, प्रादेशिक विभाग, पूणे यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक यांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर प्रस्ताव तांत्रिक तपासणीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागास सादर केला असता सार्वजनिक बांधकाम विभागाने किंमतीची परिगणना करुन रु. २८५.१६ कोटी रकमेच्या प्रस्तावास अटींच्या अधिन राहून सहमती दर्शविली आहे. तसेच शासकीय इमारतीच्या बांधकामांना मंजूरी देण्याबाबत गठीत उच्चाधिकार सचिव समितीच्या दिनांक २९.११.२०२१ रोजीच्या बैठकीत सदर प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सातारा सैनिक शाळेच्या नूतनीकरणासाठी रु. २८५.१६ कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सातारा सैनिक शाळेस प्रस्तुत बांधकामासाठी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात संदर्भीय शासन निर्णय क्र. ७, ८, ११ व १३ अन्वये मागणी क्र. ई-४, ४२०२- शिक्षण, क्रीडा, कला,व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (००) (०५) सैनिकी शाळांचे बांधकाम (कार्यक्रम), (४२०२ ६४३३), ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली एकूण रु. १२० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

३. दिनांक २६.०६.२०२४ रोजीचे पत्रान्वये शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च्ा माध्यमिक), शिक्षण संचालनालय, पुणे यांनी सातारा सैनिकी शाळेच्या नुतनीकरण करण्यासाठी वर्ष २०२४-२५ मध्ये रु. १४७.१६ कोटीची मागणी केली होती. सदर मागणीस अनुसरून माहे जूलै, २०२४ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणी सादर केली असता विधिमंडळाने रु. १४७.१६ पैकी रु. १०० कोटी इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर केली. मंजूर पुरवणी मागणी पैकी रु. ३० कोटी निधी सातारा सैनिकी शाळेच्या नुतनीकरणासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सातारा सैनिक शाळेच्या नुतनीकरणासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात, वितरीत निधी विहित पध्दतीने खर्च केला जाईल व वितरीत निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून मंजूर पुरवणी मागणी मधून रु. ३०,००,००,०००/- (रुपये तीस कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. शाळेच्या नुतनिकरण

करण्यासाठी लागणारा उर्वरीत निधी शाळेच्या कामाची प्रगती, झालेला खर्च, उपयोगिता प्रमाणपत्रे व प्रलंबित देयके तपासून देण्यात येईल असे वित्त विभागाने कळविले आहे. तेंव्हा त्याबाबतची माहिती त्वरीत सादर करण्याची दक्षता घ्यावी.

२. सदर खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात "मागणी क्र. ई-४, ४२०२- शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (००) (०५) सैनिकी शाळांचे बांधकाम (कार्यक्रम), (४२०२ ६४३३), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षातून खर्ची टाकण्यात यावा. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर केलेला आहे, त्याच कामासाठी खर्च करण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, सातारा यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी कामाबाबतचा प्रगती अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा व याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल देखील शासनास सादर करावा.

४. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, वित्तीय नियमावली व कार्यपध्दतीचे तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४ व पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दिनांक २९.०७.२०२४ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार विभागाच्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१११६४०३५४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MOHAN GANGADHAR ARSEWAD
Date: 2025.03.11 16:42:58 +05'30'

**(मोहन गं. आरसेवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
४. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५. मा. राज्य मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
६. मा. विरोधी पक्ष नेता विधान सभा/विधानपरीषद, विधानभवन, मुंबई-३२.
७. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. आयुक्त ( शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. जिल्हाधिकारी, सातारा.
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. सातारा.
१५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
१६. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७. शिक्षण संचालक ( प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८. अवर सचिव( अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. विभागीय शिक्षण उप संचालक,पुणे विभाग, पुणे.
२०. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा.
२१. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.
२२. शिक्षणाधिकारी ( माध्यमिक), जिल्हा परिषद, सातारा.
२३. प्राचार्य, सैनिकी शाळा, सातारा.
२४. कक्ष अधिकारी, (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.
२५. कक्ष अधिकारी, (कार्यासन १४७१) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६. कक्ष अधिकारी, (व्यय ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. निवडनस्ती (एसएम -६).